**शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून वास्तुशास्त्र महाविद्यालयात B.Voc. पदवी अभ्यासक्रम सुरु करण्यास विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली यांनी दिलेल्या सशर्त मान्यतेच्या अनुषंगाने शासन मान्यता देणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१७/प्र.क्र.३४८/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई .४०००३२
दिनांक : ३१ ऑगस्ट, २०१७

**संदर्भ : १) कुलसचिव , मुंबई विद्यापीठ, मुंबई यांचे पत्र क्र.REG/ICD/ २०१७-१८/५४०/२०१७, दिनांक १८/७/२०१७ चे पत्र.**
**२) विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली यांचे पत्र क्र.२-२०२/ २०१७/NSQF, दिनांक ५/७/२०१७ चे पत्र.**

**<u>प्रस्तावना</u> -:**

विद्यापीठ अनुदान आयोगाने प्रचलित अनुदानित व स्वयं अर्थसहाय्यीत विद्यापीठे / संलग्नित महाविद्यालयांमध्ये B.Voc. (Interior Design) अभ्यासक्रम सुरु करण्यासंदर्भात स्वतंत्र मार्गदर्शक सूचना सन २०१५ मध्ये निर्गमित केल्या आहेत. त्यामधील सूचना क्र.३ अन्वये ज्या महाविद्यालयांनी / विद्यापीठांनी विद्यापीठ अनुदान आयोग अधिनियम,१९५६ मधील कलम 2(f) व 12 (B) अन्वये आयोगाची मान्यता प्राप्त केली आहे, त्या संस्थांमध्ये B.Voc. अभ्यासक्रम सुरु करण्याचा प्रस्ताव संबंधित शैक्षणिक संस्था त्यांच्या संलग्नीत विद्यापीठामार्फत आयोगास सादर करता येऊ शकेल अशी तरतूद केली आहे. या अनुषंगाने (१) रचना संसद ॲकडमी ऑफ आर्किटेक्चर, प्रभादेवी, मुंबई (२) एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्किटेक्चर, बांद्रा, मुंबई या शैक्षणिक संस्थांनी मुंबई विद्यापीठामार्फत विद्यापीठ अनुदान आयोगाकडे कलम 2(f) व 12 (B) नुसार मान्यता देण्याचा प्रस्ताव अनुक्रमे दिनांक १५/०४/२०१७ व दिनांक १०/०४/२०१७ रोजीच्या पत्रान्वये सादर केला होता. त्याचबरोबर सदरच्या महाविद्यालयांनी त्यांना B.Voc. (Interior Design) या अभ्यासक्रमासाठी विद्यापीठ अनुदान आयोगाकडून ना-हरकत प्रमाणपत्र प्राप्त करण्यासाठीचा स्वतंत्र प्रस्ताव देखील मुंबई विद्यापीठामार्फत दोन्ही संस्थांनी दिनांक २०/०२/२०१७ च्या पत्रान्वये आयोगाकडे सादर केला होता.

या अनुषंगाने विद्यापीठ अनुदान आयोगाने वरील संदर्भाधीन पत्रान्वये विहित अटी/शर्तीच्या अधीन राहून कौशल्यावर आधारित B.Voc. (Interior Design) अभ्यासक्रम हा (१) रचना संसद ॲकडमी ऑफ आर्किटेक्चर, प्रभादेवी, मुंबई (२) एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्किटेक्चर, बांद्रा, मुंबई

येथे शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून सूरू करण्यास संदर्भ क्र.१ येथील दिनांक ०५/०७/२०१७ अन्वये ना-हरकत पत्र दिले आहे. यानुसार वरील नमूद संस्थांना B.Voc. (Interior Design) हा पदवी अभ्यासक्रम विहित अटी/शर्तीच्या अधीन राहून सुरु करण्यास शासन मान्यता देण्याबाबतचा शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विद्यापीठ अनुदान आयोग, नवी दिल्ली यांनी संदर्भ क्र.२ येथील पत्रान्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरुन व मुंबई विद्यापीठाने संदर्भ क्रमांक १ येथील पत्रान्वये शासनास केलेल्या शिफारशीनुसार (१) रचना संसद ॲकॅडमी ऑफ आर्किटेक्चर, प्रभादेवी, मुंबई (२) एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्किटेक्चर, बांद्रा, मुंबई या महाविद्यालयांना B.Voc. (Interior Design) हया ३ वर्षाच्या कौशल्यावर आधारित ६० प्रवेश क्षमतेसह अभ्यासक्रम शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून सुरु करण्यास खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे :-

**१)** सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

**२)** प्रस्तुत बाबतीत विद्यापीठ अनुदान आयोग व वास्तुकला परिषदेने वेळोवेळी विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील.

**३)** सदर अभ्यासक्रम सुरु करण्यापूर्वी विद्यापीठ अनुदान आयोगाकडून B.Voc. अभ्यासक्रम सुरु करण्यासाठी वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार सर्व बाबींची पूर्तता करणे आवश्यक असेल. त्या अनुषंगाने महाविद्यालयांनी सदर अभ्यासक्रम सुरु करण्यापूर्वी विद्यापीठ अनुदान आयोग अधिनियम,१९५६ मधील कलम 2(f) व 12 (B) अन्वये विद्यापीठ अनुदान आयोगाची पूर्व मान्यता घेणे बंधनकारक असेल. वरील अटींची पूर्तता करुन घेण्याची जबाबदारी मुंबई विद्यापीठाची राहील.

**४)** सदर शैक्षणिक संस्थेत सुरु असलेल्या प्रचलित अभ्यासक्रमाकरिता वास्तुकला परिषदेच्या मानकानुसार उपलब्ध करुन दिलेल्या पायाभूत सुविधा अथवा अभ्यासक्रमांवर विपरीत परिणाम होणार नाही याची दक्षता संस्थेने व विद्यापीठाने घ्यावी.

**५)** शासनाने विहित केलेल्या विद्यापीठ अनुदान आयोग आणि वास्तुकला परिषद यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई तसेच विद्यापीठातील सक्षम प्राधिकरण यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

**६)** उपरोक्त B.Voc. (Interior Design) अभ्यासक्रमाची मांडणी विद्यापीठ आयोगानी विहित केलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार असल्याची खात्री मुंबई विद्यापीठ व त्यांच्या सक्षम प्राधिकरणाने करावी.

७) सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने वरील अनुक्रमांक ३ व ४ येथील अटींची पूर्तता केल्यानंतर या महाविद्यालयांनी महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम,२०१६ मधील तरतूदीनुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने वेळोवेळी विहित केलेल्या मार्गदर्शक सूचनानुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता/संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

८) संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचीत ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

९) सदर अभ्यासक्रमाचे प्रवेश व शुल्क हे महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम,२०१६ मधील तरतूदीनुसार विहित करण्यात येतील.

१०) संबंधित अधिनियमातील तरतुदीनुसार विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

११) संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास विहित मानकांनुसार पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तांत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत. त्यांना नियमानुसार वेतन व भत्ते देण्यात यावेत. तसेच शिक्षकवृंद व इतर कर्मचाऱ्यांच्या वेतन व भत्ते इत्यादीबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी आल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

१२) संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके विद्यापीठ अनुदान आयोगाच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) करणे आवश्यक आहे.

१३) रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणेआवश्यक राहील.

१४) याशिवाय संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१५) ज्या संस्थांनी संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केलेली नाही, त्या संस्थांकडून संचालकांनी अंतीम मान्यता देण्यापूर्वी ती वसूल करावी.

१६) उपरोक्त दोन्ही संस्था वरील अटी व शर्तीचे तंतोतंत पालन करतात हे सुनिश्चित करण्याची जबाबदारी मुंबई विद्यापीठाची असेल. कायदेशीर बाबींच्या पूर्तते अभावी वरील अभ्यासक्रमात प्रवेश घेणाऱ्या

विद्यार्थ्यांचे शैक्षणिक व आर्थिक नुकसान होणार नाही या संदर्भातील दक्षता मुंबई विद्यापीठाने घ्यावयाची आहे. यात कसूर झाल्यास मुंबई विद्यापीठाची सर्वस्वी जबाबदारी राहील.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१७०८३११३२५५४८४०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dr.Kiran Patil

Digitally signed by Dr.Kiran Patil
Date: 2017.08.31 14:53:10 +05'30'

**( डॉ.किरण पाटील )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. कुलसचिव, मुंबई विद्यापीठ, मुंबई
२. संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
३. सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय, मुंबई (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
४. संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५. सचिव, विद्यापीठ अनुदान आयोग, बहादूर जफरशहा मार्ग, नवी दिल्ली .
६. सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण भाग), नवी दिल्ली.
७. प्रबंधक, वास्तुकला परिषद, नवी दिल्ली
८. प्राचार्य, रचना संसद अॅकॅडमी ऑफ आर्किटेक्चर, प्रभादेवी, मुंबई
९. प्राचार्य, एल.एस.रहेजा स्कूल ऑफ आर्किटेक्चर, बांद्रा, मुंबई
१०.निवड नस्ती/तांशि-४